प्रजासत्ताक दिन व महाराष्ट्र दिन सोहळयातील
संचलन पथकाकरीता अल्पोपहार देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार)**
**शासन निर्णय क्रमांक :सीईआर-२०१८/प्र.क्र.२६२/३०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०१ जानेवारी, २०१९

वाचा :- १) विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पोमसं/१६/६७८६/२६ जानेवारी/७८/२०१५१९, दि.१४.१२.२०१८ चे आदेश
२) अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल मुंबई यांचे क्र.९९२४/अपोआ/ सपोद/ २०१८दि.२१.१२.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

२६ जानेवारी प्रजासत्ताक दिन व १ मे महाराष्ट्र दिन हे शासकीय समारंभ शिवाजीपार्क दादर, मुंबई येथे आयोजित केले जातात. या प्रसंगी पोलीस व इतर सशस्त्र दलातील पथकाचे संचलन केले जाते. तसेच प्रजासत्ताक दिनाच्या सोहळयात विविध विभागाचे चित्ररथ देखील सामील केले जातात. या दोन्ही समारंभांकरीता ३ दिवस तालीम, १ दिवस रंगीत तालीम व मुख्य समारंभ असे एकूण ५ दिवसांसाठी संचलन पथकाकरीता दूध / लस्सी, बिस्कीटस्, केळी असा अल्पोपाहार दिला जातो. २६ जानेवारी, २०१९ रोजीच्या प्रजासत्ताक दिनानिमित्तच्या मुख्य समारंभाच्या दिवशी संचलन पथकास दूध / लस्सी, केळी व बिस्कीट ऐवजी घनरुप आहार म्हणून पायनॅपल शिरा देण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल मुंबई यांनी शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यावर उचित निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शिवाजीपार्क दादर, मुंबई येथे आयोजित २६ जानेवारी, प्रजासत्ताक दिन व १ मे, महाराष्ट्र दिन या शासकीय समारंभातील संचलन पथकास, आवश्यक संख्येनुसार, खाली नमूद केल्याप्रमाणे अल्पोपाहार देण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | तपशील | अल्पोपाहार |
|---|---|---|
| १ | समारंभाच्या तालमीकरीता | लस्सी / मसाला दुध,बिस्कीट, केळी (२ नग) |
| २ | रंगीत तालमीकरीता | लस्सी / मसाला दुध, बिस्कीट, केळी (२ नग) |
| ३ | मुख्य समारंभाच्या दिवशी | पायनॅपल शिरा व केळी (२ नग) |

२. शासनमान्य पुरवठादाराकडून दुग्धजन्य पदार्थ (लस्सी/मसाला दूध) शासनाच्या राजशिष्टाचार विभागाने उपलब्ध करुन घ्यावेत. तसेच पार्ले प्रॉडक्स मर्यादित विलेपार्ले, मुंबई -५७ यांच्याकडून बिस्कीट खरेदी करण्यात यावीत. अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, मुंबई यांनी विहित कार्यपध्दती अवलंबून केळी खरेदी करावी. तसेच, अधिकृत पुरवठादाराकडून योग्य दर्जाचा व पौष्टीक पायनॅपल शिरा कंटेनर तयार करून घेण्याची जबाबदारी ही अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, मुंबई, यांची राहील.

३. वरील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे समारंभाच्या तालमीकरीता, रंगीत तालमीकरीता व मुख्य समारंभाच्या दिवशी संचलन पथकांना सशस्त्र पोलीस दल, मुंबई यांच्या मार्फत अल्पोपहाराचे वाटप करण्यात यावे. सामान्य प्रशासन विभाग, राजशिष्टाचार शाखेतील जबाबदार अधिकारी हे वाटप प्रक्रियेवर संनियंत्रण ठेवतील.

४. सदर व्यवस्थेवरील खर्च या उपविभागाच्या "मागणी क्रमांक ए-४, २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०२) सामान्य प्रशासन विभाग, राजशिष्टाचार, ५०-इतर खर्च, संकेतांक २०५२०३२१" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्या यावा. तसेच सदर खर्च प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना प्रदान केलेल्या वित्तीय मर्यादेच्या अधिकारात भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१९०१०२१५४६२८६८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra
Gopalkrishna Gaikwad

Digitally signed by Rajendra Gopalkrishna Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e18e8c2154c8ecbcf0edc1fcc5b3e74c50aa53537f32c40ea2c1af9814e56681, cn=Rajendra Gopalkrishna Gaikwad
Date: 2019.01.02 15:56:48 +05'30'

**( रा. गो.गायकवाड )**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, मुंबई.
४. प्रधान सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२
५. विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल मुंबई
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र मुंबई-४०० ०२०.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१०.महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर भवन, मुंबई
१२.निवड नस्ती